आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेतंर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी निधी वितरण...
(लेखाशिर्ष २२३५ सी १७२)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** बीयुडी-२०१९/ प्र.क्र.६/ कार्यासन.६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० मार्च,२०२०.

वाचा -

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.विसयो-२०१०/ प्र.क्र.१७५/विसयो-२, दि.२६.१०.२०१०.
२) शासन परिपत्रक,वि. वि.,क्र.अर्थसं-२०१९/ प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.१.०४.२०१९.
३) शासन परिपत्रक, वि. वि., क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.८.०७.२०१९.
४) शासन परिपत्रक, वि. वि., क्र.पुरक-२०१९/प्र.क्र.९३/ अर्थ-३, दि.९.०७.२०१९.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र.बीयुडी-२०१९/ प्र.क्र.६/ का-६,दि.९.०५.२०१९ व दि.२९.०७.२०१९, दि.९.०१.२०२०.
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाची नस्ती क्र.विसयो-२०१९/प्र.क्र.६४/विसयो.

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वर्षात मागणी क्र.टी-५, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०२) जनजाती क्षेत्रा बाहेरील उपयोजनांतर्गत योजना (०२) (०१) श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना, लेखाशिर्ष (२२३५ सी१७२), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षांखाली रु.१११३४.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. यापैकी संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयांन्वये १०० टक्के मर्यादेतील निधीचे वितरण करण्यात आले आहे.

श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेकरीता लाभार्थ्यांना देण्यात येणाऱ्या लाभामध्ये वाढ करण्यात आली असल्याने सदर योजनेकरीता अतिरिक्त नियतव्ययातून रू.८०००.०० लाख इतकी तरतूद सन २०१९-२० च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. या अनुषंगाने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वाचा क्र.६ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजनेसाठी लेखाशिर्ष (२२३५ सी १७२), ५०-इतर खर्च या लेखाशिर्षांखालील सन २०१९-२० च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित रु.८०००.०० लाख ( अक्षरी रुपये ऐंशी कोटी फक्त) प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रक अधिकारी/ विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख व नियंत्रक अधिकारी यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या **वाचा** क्र.२, ३ व ४ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, तसेच वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१२२/२०२०/व्यय-१४, दि.६.०२.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१९१२१९५३९३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.03.20 17:36:53 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व ).
६. जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
७. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. कार्यासन क्र.१२, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.